<u>विनंती बदल्या सन-२०२३</u>
उप जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. टिआरएफ-०४२३/प्र.क्र.९८/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ जुलै, २०२३

<u>संदर्भ</u>:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(५) व सा.प्र.वि. च्या महसूल विभाग वाटप नियम, २०२१ अधिसूचना दि.१४.७.२०२१ मधील नियम ८ मधील तरतूदींनुसार खाली नमूद केलेल्या उप जिल्हाधिकारी संवर्गातील अधिका-यांना प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कार्यरत पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १) | श्रीमती दिप्ती सुर्यवंशी | उप विभागीय अधिकारी, बल्लारपूर, जि. चंद्रपूर | **उप जिल्हाधिकारी (रोहयो), पुणे** या रिक्त पदावर |
| २) | श्री. समाधान शेंडगे | निवासी उप जिल्हाधिकारी, गडचिरोली | **उप जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर** या श्री. भगवान कांबळे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |

२. उपरोक्त अधिका-यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिका-यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. श्री. भगवान कांबळे यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

४. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e२.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलव्दारे / टपालाव्दारे शासनास त्वरीत कळवावे.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** *(dies non)* **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०७२७२००५३५२२१९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURESH DATTATRAY NAIK

Digitally signed by SURESH DATTATRAY NAIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=850d803882a7cf083f80e9f3e97bd648dfbbeea0f79d5c58464988f98099e530, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=842E7F01AD6007A0F84ABAB1D0F7812EBD23BBE62268DE19A63EA2372DE520A4, cn=SURESH DATTATRAY NAIK
Date: 2023.07.27 20:07:07 +05'30'

**( सुरेश नाईक )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

सर्व विभागीय आयुक्त.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी.
७. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
१०. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
११. संबंधित उप जिल्हाधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
१२. सह सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. निवडनस्ती (ई-२).